कोविड-१९ विषाणूच्या प्रादुर्भावाच्या अनुषंगाने शैक्षणिक वर्ष २०२१-२०२२ मध्ये राज्यातील आदिवासी विकास विभागांतर्गत शासकीय व अनुदानित आश्रमशाळा व एकलव्य मॉडेल रेसिडेंशियल स्कूलमध्ये इ.१ ली ते इ.४ थी चे वर्ग सुरक्षितपणे सुरू करण्यासाठी मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक शाआशा २०२०/प्र.क्र.१२२/का.१३**
मादम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ डिसेंबर, २०२१.

**वाचा :-**

(१) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमाकः शाआशा-२०१५/प्र.क्र.१८२/का.१३ दि.१४ डिसेंबर २०१८.

(२) शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग, क्र. शाआशा २०२०/प्र.क्र.१२२/का.१३, दि.२० नोव्हेंबर, २०२०.

(३) शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग, क्र. शाआशा २०२०/प्र.क्र.११०/का.१३-अ, दि.१० डिसेंबर, २०२०.

(४) शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग,क्र. शाआशा २०२०/प्र.क्र.१२२/का.१३, दि.५ फेब्रुवारी, २०२१.

(५) शासन परिपत्रक, शालेय शिक्षण विभाग,क क्रमांक संकीर्ण : २०२१/प्र.क्र.९४/एसडी-६ दि. ७ जुलै २०२१.

(६) शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग,क्र. शाआशा २०२०/प्र.क्र.१२२/का.१३, दि.२६ जुलै, २०२१.

(७) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग,क क्रमांक संकीर्ण : २०२१/प्र.क्र.११३/एसडी-६, दि. २४ सप्टेंबर, २०२१.

(८) शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग, क्र. शाआशा २०२०/प्र.क्र.१२२/का.१३, दि.१ ऑक्टोंबर, २०२१.

(९) शासन परिपत्रक, शालेय शिक्षण विभाग,क क्रमांक संकीर्ण : २०२१/प्र.क्र.१७८/एसडी-६ दि. २९ नोव्हेंबर, २०२१.

**पार्श्वभूमी :-**

आदिवासी विकास विभागातंर्गत शासकीय, अनुदानित आश्रमशाळा व एकलव्य मॉडेल रेसिडेंशयल स्कूल कोरोना (COVID-१९) विषाणूच्या प्रादुर्भावामुळे बंद होत्या. तद्नंतर संदर्भाधीन क्र.६ येथील दि.२६ जुलै, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये शासकीय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा व एकलव्य मॉडेल रेसिडेंशयल स्कूल इ.८ वी ते १२ वी पर्यंतच्या शाळा दि.२ ऑगस्ट, २०२१ पासून सुरू करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच संदर्भाधीन क्र.८ येथील दि.१ ऑक्टोंबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये इ.५ ली ते ७ वी पर्यंतच्या शाळा दि.४ ऑक्टोंबर, २०२१ पासून स्थानिक परिस्थितीचा विचार करून सुरू करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

मागील वर्षी शाळा बंद असल्यामुळे विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान झालेले आहे. मागील वर्षभरात विविध माध्यमांतून प्रत्येक मुलापर्यंत शिक्षण पोहचविण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे, परंतु शाळा बंद असल्यामुळे मुले एक वर्षापासून घरी बसली आहेत व त्यामुळे त्यांच्यावर शारीरिक, मानसिक तणाव येऊन दुष्परिणाम होत असल्यामुळे या बाबीकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. जास्त काळ शाळा बंद राहिल्यात सदर नुकसान भरून काढणे कठीण जाईल. गतवर्षी बराच कालावधी टाळेबंदीमुळे अध्यापन व अध्ययन प्रक्रियेमध्ये खंड पडला. त्यामुळे वाढते बालविवाह, बालमजुरीचे प्रमाण, मुलींचे/मुलांचे गळतीचे प्रमाण इत्यादी मोठ्या प्रमाणावर सामाजिक नुकसान होण्याची शक्यता आहे. त्यामुळे विद्यार्थ्यांना नियमित शिक्षणाचा लाभ व्हावा यासाठी कोविड मुक्त क्षेत्रात इ.१ली ते ४ थी चे वर्ग सुरु करण्याची व आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांच्या सुरक्षिततेच्या अनुषंगाने सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. प्रस्तावनेत नमूद केलेली पार्श्वभुमी विचारात घेता, **राज्यातील कोविडमुक्त क्षेत्रात दिनांक १५ डिसेंबर, २०२१ पासून शासकीय व अनुदानित आश्रमशाळा तसेच एकलव्य मॉडेल रेसिडेंशियल स्कूलमधील इ.१ ली ते ४ थीचे वर्ग** प्रकल्प कार्यालय स्तरीय समितीने आणि शाळा ज्या गावात आहे तेथील ग्रामपंचायत यांनी ठराव करून खालील निकषांच्या आधारे सुरु करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(१) ग्रामीण भागात कोविड-मुक्त गावातील ग्रामपंचायतीने त्यांच्या अखत्यारीत असणाऱ्या गावातील शाळेमधील इ. १ ली ते इ. ४ थी चे वर्ग सुरु करण्याबाबत पालकांशी चर्चा करून तसा ठराव करावा.

(२) ग्रामपंचायत स्तरावर आदिवासी विकास विभागाच्या आश्रमशाळांची वैशिष्टे वेगळी (निवासी स्वरूप, वेगवेगळया गावातील विद्यार्थी, त्यापैकी कांही विद्यार्थी डे-स्कालर्स) अशी असल्याने शाळा सुरु करण्याचा निर्णय संबंधित प्रकल्प कार्यालय आणि स्थानिक प्रशासनाने मिळून घ्यावा. मात्र अंतिम निर्णय प्रकल्प अधिकारी यांचा राहील.

(३) शाळा सुरु करण्यापूर्वी सदर गावात कमीत कमी एक महिना कोविड रुग्ण आढळून आला नसावा.

(४) ज्या आश्रमशाळेतील शिक्षकांचा लसीकरणाचा किमान एक डोस पूर्ण झाला आहे अश्याच शिक्षकांची अध्यापनाचे कार्य करावे. ज्या शिक्षकांचा किमान १ डोस पूर्ण झालेला नाही त्यांनी त्वरित लसीकरण करून घ्यावे.

(५) शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांसाठी लसीकरणाची सोय संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी जिल्हाधिकारी आणि जिल्हा आरोग्य अधिकारी यांच्याशी समन्वय साधून उपलब्ध करून द्यावी.

(६) शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून १५ दिवसाच्या आत शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांनी लसीचा किमान एक डोस घेतला नसल्यास अशा कर्मचाऱ्यांना विनावेतन रजेवर पाठविण्यात यावे. लसीकरण घेतल्याचे प्रमाणपत्र सादर केल्यानंतर शाळेवर रुजू करून घेण्यात यावे.

(७) अभ्यासक्रम संदर्भामध्ये शालेय शिक्षण विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे. तसेच शालेय शिक्षण विभागाच्या संदर्भाधीन क्र. ७

येथील दि. २४ सप्टेंबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयातील तसेच संदर्भाधीन क्र. ९ येथील दि.२९ नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या शासन परिपत्रकातील अतिरिक्त मार्गदर्शक सूचनांचे काटेकोर पालन करण्यात यावे.

(८) शाळा सुरू करण्यापुर्वी शाळेमध्ये मुलांनी यावे यासाठी शाळा व्यवस्थापन समितीने "चला मुलांनो शाळेत चला" अशी मोहिम राबवावी.

(९) प्रकल्प अधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प स्तरीय समिती खालीलप्रमाणे असेल.

| | |
|---|---|
| (१) प्रकल्प अधिकारी | अध्यक्ष |
| (२) सहाय्यक प्रकल्प अधिकरी शिक्षण | सदस्य सचिव |
| (३) शिक्षण विस्तार अधिकारी (सर्व) | सदस्य |
| (४) संबंधित प्रकल्प क्षेत्रातील दोन मुख्याध्यापक | सदस्य |
| (५) कोविड मुक्त २ गावांचे सरपंच | सदस्य |
| (६) कोविड मुक्त २ गावांचे ग्रामसेवक | सदस्य |
| (७) शाळा व्यवस्थापन समितीचे २ अध्यक्ष | सदस्य |

(१०) वरील सर्व बाबींचे अपर आयुक्त, आदिवासी विकास, प्रकल्प अधिकारी व आरोग्य अधिकारी यांच्या समवेत सातत्याने आढावा घेऊन आवश्यक तेथे सूचना कराव्यात. शाळा सुरू करण्यापुर्वी व शाळा सुरू झाल्यानंतर आरोग्य, स्वच्छता आणि कोविड संदर्भात अन्य सुरक्षाविषयक उपाययोजनांबाबतच्या काळजी घेण्यासंबंधी **परिशिष्ट-अ** व **परिशिष्ट- ब** मध्ये दिलेल्या सुचनांचे काटेकोर पालन करण्यात यावे.

(११) वरीलप्रमाणे मार्गदर्शक सूचनाच्या अंमलबजावणीमध्ये त्रुटी आढळल्यास प्रकल्प अधिकारी यांनी संबंधीत आश्रमशाळा प्रशासनावर योग्य ती कार्यवाही करावी.

२. वरील उपाययोजनाकरिता आवश्यक वस्तु, औषधे, उपकरणांची खरेदी संदर्भ क्र.३ येथील दि.१०/१२/२०२० रोजीच्या शासन निर्णया मधील तरतूदीनूसार करावी.

३. शासकीय आश्रमशाळा व अनुदानित आश्रमशाळा तसेच एकलव्य मॉडेल रेसिडेंशियल स्कूल यांनी वरीलप्रमाणे दिलेल्या मार्गदर्शक तत्व/सूचनांचे काटेकार पालन करावे. त्यात हलगर्जीपणा केल्यास संबंधितांवर आवश्यक ती प्रशासकीय कारवाई संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी करावी.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२११२१४१२२३१३८१२४ असा आहे. सदर परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: CN = VIJESING FATTESING VASAVE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2021.12.14 12:34:37 +05'30'

**( वि. फ. वसावे )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
४. मा. अध्यक्ष व मा. उपाध्यक्ष, विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
५. मा. सभापती व मा. उपसभापती, विधान सभा, विधान भवन, मुंबई.
६. मा. मंत्री, आदिवासी विकास विभाग, यांचे खाजगी सचिव.
७. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास विभाग, यांचे खाजगी सचिव.
८. सचिव, आदिवासी विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१०. सर्व सह सचिव/उप सचिव, अवर सचिव व कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, अमरावती व नागपूर.
१२. सर्व संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१३. सर्व एकलव्य निवासी शाळा प्राचार्य (प्रकल्प अधिकारी यांच्यामार्फत)
१४. सर्व शासकीय व अनुदानित आश्रमशाळा तसेच नामांकित शाळांचे मुख्याध्यापक, शासकीय वसतीगृहांचे गृहपाल (प्रकल्प अधिकारी यांच्यामार्फत)
१५. निवड नस्ती (का-१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

## परिशिष्ट - अ

## <u>शाळा सुरू करण्यापूर्वी आरोग्य, स्वच्छता व इतर सुरक्षाविषयक उपायोजनांबाबतच्या मार्गदर्शक सूचना</u>

### १. शाळा व परिसर स्वच्छता व निर्जंतुकीकरण विषयक सुविधा सुनिश्चित करणे :-

- बंद असणाऱ्या शाळा सुरु होण्यापूर्वी शाळेचा संपूर्ण परिसर स्वच्छ करून तो Sodium Hypochlorite द्वारे निर्जंतुक करावा.
- शाळेची इमारत, सर्व खोल्या, बेंच, टेबल, खुर्ची, स्टाफ रुम रोज sodium hypochlorite च्या सहाय्याने निर्जंतुक करावी.
- डे-स्कॉलर विद्यार्थी जेव्हा घरून शाळेत येतील त्यावेळी त्यांना बाहेरील नळावर हातपाय स्वच्छ धुवून, तोंडाला मास्क लावून व हात हॅन्ड सॅनिटाइझ करूनच वर्गात प्रवेश द्यावा. शाळेच्या मुख्य दाराजवळ या डेसस्कॉलर मुलांसाठी नळ बसविण्यात यावेत.
- शाळा सुरु करण्यापूर्वी निवासी विद्यार्थ्यांना वसतिगृहात प्रवेश देते वेळी निवासी खोल्या, कपाटे, पेट्या निर्जंतुक कराव्यात, विद्यार्थ्यांचे अंथरून व पांघरून वेळोवेळी पांघरून गरम पाण्याने धुवून घेण्यात यावे. वसतीगृहामध्ये उशिराने आलेल्या विद्यार्थ्यांना तसेच कोविडची लक्षणे असलेल्या विद्यार्थ्यांना विलगीकरण कक्षात ठेवण्यात यावे.
- वसतीगृहामध्ये पाणी पिण्याची जागा, जेवणाची जागा, झोपण्याची जागा, बाथरूम, टॉयलेट, दररोज निर्जंतुक करण्यात यावे.
- सर्व विद्यार्थ्यांचे दप्तर सॅनिटाईझ करतांना १% सोडियम हैड्रोक्लोराइडचा स्प्रे मारावा, यासाठी शाळेच्या गेट वर १% सोडियम हैड्रोक्लोराइडचा स्प्रे उपलब्ध करून देणे ही शाळेची जबाबदारी असेल.
- वर्ग सुरु करण्यापूर्वी थर्मल स्क्रिनिंग, ऑक्सिजन लेव्हल (Spo२) मोजणे, मुलांचे हात हॅन्ड सॅनेटायझरने व दप्तर सॅनेटाईझ करूनच वर्गात प्रवेश द्यावा. याची खबरदारी वर्गशिक्षक घेतील.
- शाळेत राहणाऱ्या सर्व कर्मचाऱ्यांचे निवासाचे निर्जंतुक करून घेणेत यावे.
- डोअर नॉब, कॅबिनेट हँडल्स, कपाटे, लाइट स्विच, खुर्च्या, कॉट्स, फोन, संगणक, बेसिन, टॉयलेट आणि वैद्यकीय उपकरणे यासह फरशी स्वच्छ आणि निर्जंतुक करण्याचे लक्षात ठेवा. याकरिता आवश्यक ती सर्व साधने जसे कि झाडू, ब्रश, फिनेल इत्यादी मुख्याध्यापकांनी शाळा व्यवस्थापन समिती निधी मधून उपलब्ध करून द्यावेत
- शालेय कामकाजाच्या वेळेमध्ये २ शिक्षकांची नेमणूक कोविड व्यवस्थापक म्हणून मुख्याध्यापकांनी करावी. सदर शिक्षक १ महिन्याकरिता पदभार सांभाळून पुढच्या महिन्यात इतर शिक्षकांकडे कोविड व्यवस्थापक पदाची जबाबदारी देतील. कोविड व्यवस्थापक शिक्षकांनी शाळेमध्ये सदर पत्रकातील नमूद सूचनांचे पालन काटेकोर पणे होईल या संबंधी लक्ष घालावे. मुख्याध्यापक या कामी त्यांना संपूर्ण सहकार्य करतील. शालेय कामकाजाचे तास वगळता या कोविड व्यवस्थापकांनी शाळेमध्ये निवासी थांबून अधीक्षक व अधीक्षिका यांच्या सहाय्याने आपली जबाबदारी पार पाडावी. कोविड व्यवस्थापक हे पद अत्यंत जबाबदारीचे असून नमूद सूचनांचे पालन करण्यात ते अयशस्वी

झाले असे आढळून आल्यास संबंधित प्रकल्प कार्यालयाने त्यावर कारवाई करावी. विद्यार्थ्यांच्या आरोग्याबाबत कोणतीही कसर राहता कामा नये.

**२. शिक्षकांची कोविड-१९ बाबतची चाचणी :-**

- शाळा सुरू करण्यापुर्वी शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांची कोविड-१९ ची RT-PCR चाचणी करणे आवश्यक आहे. तसे प्रमाणपत्र शाळा व्यवस्थापनास सादर करावे व शाळा व्यवस्थापनाने त्यांची पडताळणी करावी.
- ज्या शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे चाचणी अहवाल पॉझिटिव्ह असतील त्यांनी कोविड मुक्त झाल्यानंतरच शाळेत उपस्थित राहावे. शाळेच्या प्रमुखांनी आजारी असल्याच्या कारणामुळे कर्मचाऱ्यांस रजेवर राहण्याची परवानगी द्यावी.
- ज्या शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे अहवाल निगेटिव्ह असतील त्यांनी शाळेत उपस्थित राहताना कोविड-१९ संदर्भातील सर्व मार्गदर्शन सुचनाचे पालन करणे आवश्यक राहील. तसेच कोविड-१९ बाबतचे लक्षणे आढळल्यास त्वरीत चाचणी करून घ्यावी.

**३. बैठक व्यवस्था :-**

- वर्गखोली तसेच स्टाफ रूम मधील बैठक व्यवस्था शारीरिक अंतर (Physical Distancing) च्या नियमांनुसार असावी.
- वर्गामध्ये एका बाकावर एक विद्यार्थी याप्रमाणे बैठक व्यवस्था असावी.

**४. शारीरिक अंतर (Physical distancing) च्या नियमांच्या अंमलबजावणीकरिता विविध चिन्हे व खुणा प्रदर्शित करणे :-**

- शाळेत दर्शनी भागावर Physical distancing, मास्कचा वापर इत्यादी संदर्भात मार्गदर्शक सूचना प्रदर्शित करावे.
- थूंकण्यावरील बंदीची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.
- शाळेच्या अंतर्गत व बाह्य परिसरामध्ये रांगेत उभे राहण्याकरिता किमान सहा फूट इतके शारीरिक अंतर (Physical distance) राखले जाईल याकरिता विशिष्ट चिन्हे जसे चौकोन, वर्तुळ इत्यादींचा वापर गर्दी होणारी ठिकाणे जसे पाणी पिण्याच्या सुविधा , हात धुण्याच्या सुविधा, स्वच्छतागृहे इत्यादी ठिकाणी करण्यात यावा.
- शारीरिक अंतर (Physical distance) राखण्यासाठी जेथे शक्य असेल तेथे येण्या व जाण्याचे वेगवेगळे मार्ग निश्चित करणाऱ्या बाणांच्या खुणा दर्शविण्यात याव्यात.

**५. शाळेतील कार्यक्रम आयोजनावरील निर्बंध** :-

- परिपाठ, स्नेह संम्मेलन, क्रीडा व इतर तत्सम कार्यक्रम ज्यामुळे अधिक गर्दी होऊ शकते अशा कार्यक्रमांच्या आयोजनावर कडक निर्बंध असेल.

**६.पालकांची संमती व पालकांनी घ्यावयाची दक्षता :-**

- विद्यार्थ्यांनी शाळेत उपस्थितीत राहण्यापुर्वी त्यांच्या पालकांची लेखी संमती घेणे आवश्यक असेल. शाळा व्यवस्थापन समितीने पालकांशी वरील विषयी चर्चा करावी.
- आजारी असलेल्या किंवा लक्षण असलेल्या मुलांना पालकांनी शाळेत पाठवु नये.

**७. विद्यार्थी, पालक, शिक्षक व समाजातील सदस्य यांना कोविड-१९ च्या संदर्भातील आव्हाने व त्याबाबतची त्यांची भूमिका याबाबत जागरुक करणे:-**

- शाळा सुरु करण्यापूर्वीच विद्यार्थी, पालक, शिक्षक व समाजातील सदस्य यांच्यात जागरुकता निर्माण करण्याकरिता शाळा व्यवस्थापन समितीने पत्रके, पत्रे व सार्वजनिक घोषणांच्या माध्यमांचा वापर करून पुढील मुद्यांबाबत कार्यवाही करावी :-
    - वैयक्तिक स्वच्छता व नेहमी वापरण्यात येणारे पृष्ठभागांचे निर्जंतुकीकरण इत्यादीबाबत काय करावे किंवा काय करू नये याबाबतच्या सुचना.
    - शारीरिक अंतर पालनाचे (Physical distancing) चे महत्व.
    - कोविड-१९ च्या प्रतिबंधानासाठी आवश्यक स्वच्छताविषयक करावी.
    - कोविड-१९ बाबतच्या गैरसमजुती.
    - कोविड-१९ ची लक्षणे आढळल्यास शाळेत जाणे टाळणे.
    - मास्कचा वापर करावा.
    - हात सातत्याने साबणाने स्वच्छ करावेत.

- केंद्रीय आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय यांच्या सुचनांनुसार, सर्वच कर्मचारी जे (कोविड-१९ च्या अनुषंगाने) अधिक उच्च धोक्याच्या पातळीमध्ये आहेत, जसे वयोवृध्द कर्मचारी, दिव्यांग कर्मचारी, गरोदर महिला कर्मचारी व जे कर्मचारी औषध-उपचार घेत आहेत, त्यांनी अधिक काळजी घ्यवी. त्यांनी शक्यतो विद्यार्थ्यांच्या प्रत्यक्ष संपर्कात येऊ नये.

८. **शाळेतील उपस्थीबाबतच्या धोरणांमध्ये सुधारणा करणे :-**

- विद्यार्थ्यांची शाळेतील उपस्थिती बंधनकारक नसून पुर्णत: पालकांच्या संमतीवर अवलंबून असेल.

**शाळेतील कर्मचाऱ्यांना त्यांना नेमून दिलेल्या कामाव्यतिरिक्त आणिबाणीच्या प्रसंगी इतर कर्मचाऱ्यांची कामे करण्यासाठी प्रशिक्षित करावे.**

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: CN = VIJESING FATTESING VASAVE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2021.12.14 12:34:57 +05'30'

**( वि. फ. वसावे )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

## परिशिष्ट-ब
## शाळा सुरू झाल्यानंतर आरोग्य, स्वच्छता व इतर सुरक्षाविषयक उपाययोजनाबाबतच्या मार्गदर्शक सूचना :-

### १) शाळेत व शाळेच्या परिसरात स्वच्छता व आरोग्यदायी परीस्थिती सतत राखणे:-

- शाळेचा परीसर दररोज नियमितपणे स्वच्छ केला जावा.
- शाळेतील वर्गखोल्या व वर्गखोल्यांच्या बाहेरील नेहमी स्पर्श होणारा पृष्ठभाग जसे स्वचछतागृहे, लॅचेस, अध्ययन-अध्यापन साहित्य, डेस्क, टॅबलेट्स, खुर्च्या,वाहने इ.वारंवार स्वच्छता व निर्जंतुकीकरण करण्यात यावे.
- शाळेतील व शाळेच्या परीसरातील सर्व कचऱ्याची नियमितपणे विल्हेवाट लावण्यात यावी.
- हात धुण्याच्या सर्व ठिकाणी साबण, हॅन्डवॉश व स्वच्छ पाण्याची व्यवस्था करण्यात यावी.
  शक्य झाल्यास सॅनिटायझर सर्व महत्वाच्या ठिकाणी ठेवण्यात यावा.
- सुरक्षित व स्वच्छ पिण्याचे पाणी विद्यार्थ्यांना उपलब्ध होईल याची दक्षता घेण्यात यावी.
- विद्यार्थ्यांनी सोबत स्वत:ची वॉटर बॅाटल आणण्यासाठी त्यांना प्रोत्साहीत करावे.
- शाळा सुरू होण्यापूर्वी व शाळा सुटल्यानंतर शाळा व वर्ग खोल्यांचे नियमितपणे निर्जंतुकीकरण करण्यात यावे.
- वरील सर्व स्वच्छतेमध्ये विद्यार्थ्यांना सहभागी करून घेऊ नये.

### २. शाळेत विद्यार्थ्यांची सुरक्षा व शारिरीक अंतर :-

- जास्त विद्यार्थी असलेल्या शाळा दरदिवशी दोन सत्रांमध्ये भरविण्यात याव्यात.
- सर्व विद्यार्थी, शिक्षक व कर्मचारी वर्ग यांनी शाळेत येताना व शाळेत असेपर्यंत तसेच, शाळेत कोणतीही कृती करताना मास्कचा वापर करावा. तसेच, विद्यार्थी मास्कची अदलाबदल करणार नाहीत याची दक्षता घ्यावी.
- विद्यार्थी, शिक्षक व कर्मचारी वर्गाची दररोज Thermal Screening चाचणी घेण्यात यावी.
- विद्यार्थी, शिक्षक व शाळेतील कर्मचाऱ्यांव्यतिरिक्त इतर कोणत्याही व्यक्तिला शाळेच्या परिसरात व शाळेच्या प्रवेशद्वारावर प्रवेश देऊ नये.
- काही विद्यार्थी सूचनांचे पालन करत नसल्यास ते त्यांच्या पालकांच्या निदर्शनांस आणावे.
- निवासी व डे-स्कॉलर विद्यार्थ्यांचे वर्ग वेगवेगळे भरविण्यात यावे. निवासी व डे स्कॉलर विद्यार्थी संपर्कात आल्याने कोविडचा प्रादुर्भाव होण्याची दाट शक्यता आहे. त्याकरिता त्यांचे वर्ग वेगळे व वेगळ्या वेळेत भरविण्यात यावेत. सकाळी ९.३० ते १.३० दरम्यान डे स्कॉलर विद्यार्थी तर दुपारी २ ते ६ या वेळेत निवासी विद्यार्थ्यांची शाळा भरविण्यात यावी. दुपारी १.३० ते २ या काळात डे स्कॉलर विद्यार्थी बसलेल्या वर्गांचे निर्जंतुकीकरण करण्यात यावे. निवासी विद्यार्थ्यांचे दुपारचे जेवण दुपारी १.३० पूर्वी उरकण्यात यावे. शाळा सुटल्यानंतर डे स्कॉलर विद्यार्थ्यांना थेट घरी जाण्यासंबंधी सूचना द्याव्यात.

- कोणत्याही परिस्थिती मध्ये निवासी व डे स्कॉलर विद्यार्थ्यांचा संपर्क टाळणे ही मुख्याध्यापक व कोविड व्यवस्थापक शिक्षक यांची जबाबदारी असेल.
- शाळेच्या एका वर्गखोलीत ६ फुट अंतराने साधारणपणे जितके विद्यार्थी बसू शकतील, तितकेच विद्यार्थी बसवावेत. बेंचची सुरवातीची एक रांग मोकळी ठेवावी जेणेकरून विद्यार्थी व शिक्षक यांचा थेट संपर्क येणार नाही.
- जेवणाच्या सुट्टीची वेळ वाढवून द्यावी, जेवणासाठी बसण्याची सोय पाऊस नसेल तर मोकळ्या पटांगणात / पाऊस असेल ते मोकळ्या हवेशीर जागेत करावी, तसेच जेवणासाठी वर्गाखोलीतून एका वेळी ५-५ च्या गटाने विद्यार्थी सोडावेत जेणेकरून गर्दी टाळता येईल, जेवणानंतर पाणी पिणे, ताट धुण्यासाठी मुले गर्दी करतात ती गर्दी टाळण्यासाठी ६ फुटाच्या च्या अंतराने १० नळ मोकळ्या जागेत बसवावेत . जेवण वाढणाऱ्या कर्मचाऱ्यांनी मास्क आणि हातमोजे घालावे. वरील नियमांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
- शाळेत उपस्थित सर्वच शिक्षकांची विद्यार्थी व इतर कोरोनामुक्त कसे राहतील याप्रति जबाबदारी असेल. प्रसंगी मुख्याध्यापकानी नेमून दिलेली जबाबदारी पार पाडणे हे त्यांचे कर्तव्य असेल. त्याबाबत दुर्लक्ष झाल्यास कारवाईस सामोरे जावे लागेल.
- प्रत्येक वर्गामध्ये विद्यार्थी गर्दी करणार नाहीत यासाठी छोटे ग्रुप करून एक ग्रुप लीडर विद्यार्थी नेमावा.
- ग्रुप लीडर हा मुलांकडे लक्ष ठेवून जर कोणी मुलं आजारी असेल, सर्दी, ताप, खोकला असेल तर ताबडतोब त्याच्या विषयी माहिती कोविड व्यवस्थापक अधीक्षक /अधिक्षिका यांना देईल. कोविड व्यवस्थापक , सर्वच शिक्षक, शिक्षिका यांनी विद्यार्थ्यांमध्ये काही लक्षणे दिसत आहेत का याबाबत खात्री करावी. तसे असल्यास संबंधित बाब मुख्याध्यापक, अधीक्षक व अधीक्षिका, अटल आरोग्य वाहिनी डॉक्टर, डिजी हेल्थ प्रणाली, अमेया कमांड सेंटर यांच्या निदर्शनास आणून देतील. अटल आरोग्य वाहिनी व डीजी हेल्थ प्रणाली- कमांड सेंटर मार्फत उपस्थित व आजारी विद्यार्थ्यांची संख्या माहिती विचारण्यात येईल. सदर माहिती विद्यार्थ्यांचे हित लक्षात घेऊन पुरविणे मुख्याध्यापक, अधीक्षक व अधीक्षिका यांस पुरविणे बंधनकारक असेल. माहिती पुरविण्यास टाळाटाळ केल्यास प्रकल्प कार्यालय त्यासंबंधी कारवाई करेल.
- शाळेच्या आवारात, वर्ग सुरु असतांना, जेवतांना, वसतीगृहामध्ये मध्ये झोपतांना सोशल डिस्टन्स ठेवण्याविषयी वारंवार मुलांना सूचना देणे हि बाब गरजेची आहे. याकरिता कोविड व्यवस्थापक, मुख्याध्यापक, अधीक्षक व अधीक्षिका जबाबदार राहतील.

शाळेच्या परिसरात, वसतिगृहात कोरोना बाबतची माहिती असलेले पोस्टर दर्शनी भागात लावावे . सर्वच ठिकाणी विद्यार्थी, शिक्षक व कर्मचारी यांनी सुरक्षित अंतर राखणे आवश्यक आहे.

**३. विद्यार्थीच्या वैयक्तिक स्वच्छतेबाबत सूचना –:**

- नवीन वर्ग सुरु करताना निवासी राहणाऱ्या विद्यार्थ्यांची कोविड १९ तपासणी करून घेऊन मगच शाळेत प्रवेश देण्यात यावा जेणे करून इतर विद्यार्थ्यांस विषाणू प्रादुर्भाव होणार नाही.
- शाळेत थर्मल स्क्रिनिंग साठी लागणारे साहित्य, पल्स ऑक्सिमीटर, थर्मामिटर उपलब्ध असावे. नसल्यास विहित पद्धतीने त्वरित खरेदी करावे.

- वर्ग सुरु करण्यापूर्वी थर्मल स्क्रिनिंग, ऑक्सिजन लेव्हल (Spo२) मोजणे, मुलांचे हात हॅन्ड सॅनेटायझरने व दप्तर सॅनेटाईझ करूनच वर्गात प्रवेश द्यावा व या बाबीची रोजची नोंद शाळेकडे असणे बंधनकारक आहे. याची खबरदारी वर्गशिक्षक घेतील.
- इयत्ता १ ली ते इ.४ थीच्या वर्गासाठीच्या शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांनी शाळामध्येच निवासी राहावे. जेणे करून कोविड-१९ संसर्गास आळा घालता येईल.
- मुख्याध्यापकांनी विद्यार्थ्यांना तोंडाला बांधण्यासाठी मास्क, हात धुण्यासाठी सॅनेटायझर, साबण, अंघोळीसाठी गरम पाणी उपलब्ध करून द्यावे.
- विद्यार्थी व शिक्षकांनी चेहऱ्याला मास्क किंवा रुमाल लावणे बंधनकारक असेल. रुमाल वापरल्यानंतर दररोज धुण्याबाबत सूचना करावी .
- सर्व विद्यार्थ्यांना आंघोळीसाठी एकाच वेळी सोडू नये. गटाच्या माध्यमातून त्यांना सोडण्यात यावे.
- विद्यार्थ्यांनी कपडे, टॉवेल्स, साबण, पेन, वही, भांडे, दुसऱ्याचे वापरु नये याबाबत विद्यार्थ्यांमध्ये जागृती निर्माण करावी .
- विद्यार्थ्यांना नियमित हात धुण्यासाठी प्रेरित करावे .हात कसे स्वच्छ धुवावे याचा डेमो देण्यात यावा.
- विद्यार्थ्यांनी तोंड नाक, डोळे किंवा शरीराच्या इतर भागाकडे अनावश्यक स्पर्श करणे टाळले पाहिजे या संबंधी त्यांना वेळोवेळी सूचित करावे जेणे करून विषाणू चा प्रादुर्भाव टाळता येईल .
- ये जा करणाऱ्या शिक्षकांनी विशेष काळजी घ्यावी. आपल्यामुळे विद्यार्थ्यांच्या जीवितास धोका निर्माण होणार नाही याबाबत त्यांनी संपूर्ण ती खबरदारी घ्यावी.
- सर्व शिक्षकांनी शाळेमध्ये असताना N ९५ मास्क वापरणे बंधनकारक असेल. सर्व शिक्षक व कर्मचारी यांनी इतर वेळी देखील कार्यालय, स्टाफ रूम मध्ये सर्व मार्गदर्शक सूचनांचे पालन करावे. इतर कर्मचारी यांनी विद्यार्थ्यांच्या अजिबात संपर्कात येऊ नये. वाढप्यांनी N९५ मास्क घालणे बंधनकारक असेल. मुख्याध्यापकांनी तो उपलब्ध करून द्यावा.
- शाळेत, वसतिगृहात अटल आरोग्य वाहिनी व डिजी हेल्थ प्रणाली कमांड सेंटर चे फोन नंबर दर्शनी भागावर लावण्यात यावे जेणे करून मुलाना काही अडचण असल्यास ते त्वरित संपर्क करू शकतील.
- वसतिगृहात राहणारे मुले व कर्मचारी ह्यांचे आरोग्य तपासणी किमान ३ महिन्यातून एक वेळा व्हावी.
- टीबी, दमा, सिकल सेल ऍनिमिया, रक्तक्षय, कॅन्सर या सारखे दुर्धर आजार असणाऱ्या विद्यार्थ्यांना शाळेत न बोलावता घरी राहून त्यांचा अभ्यास कसा करून घेता येईल या विषयी शिक्षकांनी त्यांना मार्गदर्शन करावे.
- मध्यवर्ती स्वयंपाकघरात/ शाळेच्या स्वयंपाक गृहात स्वच्छतेसाठी आवश्यक उपाययोजना करावी. मध्यवर्ती स्वयंपाकघरातील कोणताही सदस्य आजारी असल्यास त्याला स्वयंपाकघरात प्रवेश दिला जाऊ नये.
- सर्व खोल्यांची स्वच्छता नियमित करावी. प्रत्येक खोलीत जास्तीत हवेचे अभिसरण (वायू विजन) व्हावे याकरिता प्रयत्न करावेत.

**४. कर्मचारी व विद्यार्थी यांचा सुरक्षित प्रवेश व गमन (Entry and Exit) :-**

- विद्यार्थी व कर्मचारी वर्गाचे आगमन व गमन (Entry and Exit) यांचे वेळापत्रक अशा प्रकारे निश्चित करावे, ज्यामुळे शाळेत होणारी गर्दी टाळली जाईल.
- दर दिवशीच्या दोन संत्राच्या मध्ये योग्य तो कालावधी देण्यात यावा ज्यामुळे विद्यार्थ्यांमध्ये योग्य ते शारिरीक अंतर राखणे शक्य होईल.
- शाळेस एकापेक्षा अधिक प्रवेशद्वार असल्यास शाळेत येताना व जातांना सर्व प्रवेशद्वारांचा वापर करावा.
- कुटुंबातील एखादा सदस्य ताप/खोकला यांनी आजारी असल्यास आपल्या मुलांना पालकांनी शाळेत पाठवू नये.

**५. वर्गखोल्या व इतर ठिकाणी सुरक्षिततेच्या मानकांची खात्री करावी :-**

- शाळेत प्रात्यक्षिक (Practicals) घेताना विद्यार्थ्यांचे लहान लहान गट करून घेण्यात यावेत म्हणजे शारीरिक अंतराचे (Physical Distancing) पालन करणे सुलभ होईल.
- विद्यार्थ्यांनी कोणतेही साहित्य जसे पुस्तके, वही, पेन, पेन्सिल, वॉटर बॉटल, शाळेत येताना सोबत आणावे व त्यांची अदलाबदल करू नये.
- शक्य असल्यास वर्ग खुल्या परिसरात घ्यावेत. शक्य  नसल्यास वर्ग खोल्यांची दारे व खिडक्या उघड्या ठेवण्यात याव्यात.
- उदवाहन () व व्हरांड्यांतील उपस्थित व्यक्तीच्या संख्येवर निर्बंध आणावेत.
- स्वच्छतागृहामध्ये अधिक गर्दी होऊ नये. याची दक्षता घ्यावी.
- विद्यार्थ्यांनी प्रत्येक कृती केल्यानंतर हात स्वच्छ धुवावेत.

**६. अभ्यासवर्गाची व्यवस्था :-**

- जास्त विद्यार्थी असलेल्या शाळा दरदिवशी दोन सत्रांमध्ये भरविण्यात याव्यात.
- प्रत्यक्ष वर्गांचा कालावधी ३ ते ४ तासांपेक्षा अधिक असू नये. प्रत्यक्ष वर्गांकरिता जेवणाची सुट्टी नसेल.

**७. मानसिक व सामजिक कल्याण :-**

- चिंता आणि निराशा यासारख्या मानसिक आरोग्याच्या समस्या नोंदविणाऱ्या किंवा सांगणाऱ्या विद्यार्थी आणि शिक्षकांची नियमित समुपदेशन केले जाईल. याचे नियोजन करावे.

**८. सीक रूमची उपलब्धता व दुरुस्ती :**

- सर्व मुख्याध्यापकांनी शाळा उघडण्यापूर्वी सीकरूम ची स्वच्छता करून घ्यावी. सीक रूम करिता उपलब्ध सामान त्या ठिकाणी लावून घ्यावे.
- सीक रूम मधील नळ जोडणी, वीज जोडणी इतर विजेची उपकरणे तपासून आवश्यकते नुसार त्यांची दुरुस्ती शाळा व्यवस्थापन समितीच्या निधीमधून करून घ्यावी.
- सीक रूम मध्ये कोरोना च्या अनुषंगाने काही नवीन उपकरणे व औषधे घ्यावी लागतील त्याचा खर्च शाळा व्यवस्थापन समितीच्या आरोग्य करिता राखीव निधी मधून करण्यात यावा.
- ज्या सीक रूम ची दुरुस्ती मोठी असेल त्या ठिकाणी मुख्याध्यापकांनी तत्काळ दुरुस्तीचा प्रस्ताव सदर करून प्रकल्प कार्यालयास सदर करावा.

- ज्या ठिकाणी सीक रूम उपलब्ध नसेल अशा आश्रमशाळांनी नवीन सीक रूम करिताचा मागणी प्रस्ताव प्रकल्प कार्यालयास सादर करावा .
- सदर शाळांनी एक अथवा दोन वर्ग खोल्या किंवा वसतिगृहातील खोल्या सीक रूम करिता तयार ठेवाव्यातया मध्ये . बेड व कपाटे यांची सोय करावी.
- अशा वेळी स्वच्छता गृह जवळ असेल याची काळजी घ्यावी. आवश्यकवेळी वापराकरिता तयार असणारी फायबर ची स्वच्छतागृहे विकत घ्यावीत.
- याबरोबरच मुले व मुली यांच्या वसतीगृहामध्ये प्रत्येकी एक खोली विलगीकरण कक्ष म्हणून राखीव ठेवावी या मध्ये .कोरोना संशयित विद्यार्थी यांना टेस्ट करिता नेण्यापूर्वी व टेस्ट केल्यावर विलागीकरणात ठेवता येईल.

**९. मुख्याध्यापक अधीक्षक/अधीक्षक व शिक्षक यांच्या सिक रूम प्रति जबाबदाऱ्या :-**

- मुख्याध्यापकांनी वरील मार्गदर्शक सूचनांप्रमाणे सीक रूमची दुरुस्ती करून घ्यावी.
- अधीक्षक या कामी मुख्याध्यापकांना मदत करतील.
- अधीक्षकांनी वेळोवेळी सीक रूम ची स्वच्छता संबंधित कर्मचार्यांकडून करून घ्यावी. याबाबतच्या मार्गदर्शक सूचना उपलब्ध करून देण्यात आल्या आहेत.
- अधीक्षिका यांनी अटल आरोग्य वाहिनी व डिजी हेल्थ प्रणालीच्या डॉक्टरांच्या सहाय्याने सीक रूमचे व्यवस्थापन करावे .
- आरोग्य शिक्षण शिक्षिका ( उपलब्ध असल्यास) अटल आरोग्य वाहिनी व डिजी हेल्थ प्रणालीच्या डॉक्टरांच्या सहाय्याने वैद्यकीय उपकरणे हाताळणे, औषधांची माहिती करून घ्यावी. औषधांचा उपलब्ध साठा यावर लक्ष ठेवावे. मुख्याध्यापकांकडे आवश्यकते नुसार आधीच मागणी नोंदवावी.
- आरोग्य शिक्षिका/ अधीक्षिका / क यांनी सीक रूम मध्ये दाखल असणाऱ्या विद्यार्थ्यांच्या तब्येती वर लक्ष ठेवावे. उपलब्ध वैद्यकीय उपकरणांचा वापर त्या ठिकाणी करावा.

**१०. आश्रमशाळांमध्ये आवश्यक औषधसाठा –:**

- कोविड १९ च्या अनुषंगाने आवश्यक असणारी औषधे प्रथम संबंधित प्राथमिक आरोग्य केंद्राकडून उपलब्ध करून घ्यावीत. जर सदरची औषधे प्राथमिक आरोग्य केंद्राकडे उपलब्ध न झाल्यास मुख्याध्यापकांनी शाळा व्यवस्थापन समितीच्या आरोग्य करिता राखीव रु.१.०० लाख निधीतून खरेदी करावी.
- निधी उपलब्ध नसल्यास तत्काळ प्रकल्प कार्यालयाकडे मागणी नोंदवावी. प्रकल्प अधिकारी यांनी जबाबदारीने सदर निधी उपलब्ध करून द्यावा.

**११. सीक रूममधील सुधारणा :-**

विद्यार्थ्यांचे विलगीकरण व प्रसंगी पॉझिटिव्ह विद्यार्थ्यांवर उपचार करण्याच्या दृष्टीने सीक रूमच्या आकृतीबंधामध्ये पुढीलप्रमाणे फेरबदल करावेत.




**१२. आजारी विद्यार्थ्यांचे व्यवस्थापन :-**

- रोजच्या तपासणी दरम्यान विद्यार्थ्यांचे ठराविक मर्यादेपेक्षा तापमान जास्त भरल्यास अथवा SPO२ कमी भरल्यास अशा विद्यार्थ्यांना तात्काळ सीक रूम मध्ये ठेवावे. अटल आरोग्य वाहिनी /डिजी हेल्थ प्रणाली डॉक्टर यांच्याशी संपर्क साधून सदर विद्यार्थ्यांच्या लक्षणाबाबत सूचित करावे. विद्यार्थ्यास बोलवून, संपूर्ण माहिती घेऊन अटल आरोग्य वाहिनी / डिजी हेल्थ प्रणाली डॉक्टर प्राथमिक उपचारांसंबंधी मार्गदर्शन करतील.
- लक्षणे कोविड सदृश्य नसल्यास प्राथमिक उपचार व प्रसंगी मोठ्या रुग्णालयात संदर्भित करण्यात यावे.
- पुढील लक्षणे असल्यास गांभीर्याने घ्यावीत सर्दी, खोकला, अंगदुखी व ताप -इन्फल्युएंझा सदृश्य इलनेस लक्षणे.
- सदर लक्षणे असलेले विद्यार्थ्यांचे विलगीकरण करून अटल आरोग्य वाहिनी डिजी हेअल्थ / प्राथमिक आरोग्य केंद्र/प्रणाली डॉक्टरयांनी सदर विद्यार्थ्यांना तात्पुरत्या स्वरुपात विलगीकरण कक्षात भरती करावे .
- सदर विद्यार्थ्याच्या तब्येतीमध्ये सुधारणा होत आहे की, नाही याबाबत अटल आरोग्य वाहिनी / डिजी हेल्थ प्रणाली डॉक्टर कटाक्षाने लक्ष ठेवतील.
- सुधारणा होत नसेल किंवा लक्षणे तीव्र होत असतील अथवा कोरडा खोकला, कफ, ऑक्सिजन लेव्हल ) SPO (२कमी भरणे व श्वास घेण्यास त्रास होणे या प्रकारे लक्षणे आढळून आल्यास तात्काळ विद्यार्थ्यास अटल आरोग्य वाहिनी प्राथमिक आरोग्य / डिजी हेअल्थ प्रणाली डॉक्टर/ केंद्रयांनी कोविड १९ टेस्ट करून पॉझिटिव्ह आल्यास डेडिकेटेड कोविड हॉस्पिटल येथे भरती करावे .
- समूहाने विद्यार्थी आजारी पडत आहेत हे निदर्शनास आल्यास कोणताही वेळ न घालवता तत्काळ आजारी विद्यार्थ्यांची कोविड १९ टेस्ट करण्यात यावी.
- डे स्कॉलर विद्यार्थी पॉझिटिव्ह आल्यास त्याच्या संपर्कात आलेल्या सर्व डे स्कॉलर व निवासी विद्यार्थ्यांची कोविड तपासणी करावी

- टेस्ट केलेल्या विद्यार्थ्यांस शाळेतील विलागीकरण कक्षात अहवाल प्राप्त होई पर्यंत ठेवावे. यावेळी ते विद्यार्थी कायम ६ फुटांचे अंतर ठेवतील याबाबत काटेकोर पणे लक्ष द्यावे. अन्यथा त्यापैकी एक अथवा दोन लागण झालेले विद्यार्थ्यांमुळे इतर संशयित रुग्णांना विषाणू ची लागण होण्याचा मोठा धोका असू शकतो.
- कोविड १९ टेस्ट चा अहवाल प्राप्त झाल्यानंतर पॉझिटिव्ह विद्यार्थ्यास तत्काळ सार्वजनिक आरोग्य विभागाच्या विलगीकरण कक्षात भरती करण्यात यावे.
- टेस्ट करण्या पूर्वी तो विद्यार्थी किती विद्यार्थ्यांच्या संपर्कात आला होता हे तपासून त्या विद्यार्थ्यांची टेस्ट करण्यात यावी. त्यासंबंधी पुन्हा मुद्दा क्रमांक ५ मधील सूचनांचे पालन करावे.
- टेस्ट करून निगेटीव्ह आलेल्या विद्यार्थ्यांना शाळेच्या विलगीकरण कक्षात ठेवावे. हे विलगीकरण सार्वजनिक आरोग्य विभागाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे असावे.
- पॉझिटिव्ह विद्यार्थी , संशयित विद्यार्थी व सामान्य विद्यार्थी यांचे विलगीकरण करताना योग्य ती खबरदारी घेण्यात यावी जेणेकरून विषाणू चा प्रादुर्भाव वाढणार नाही.
- विद्यार्थी आजारी असल्यास त्वरित कोविड टेस्ट करण्यावर भर द्यावा. लवकर निदान व योग्य उपचार याद्वारे कोरोना वर आपण मत करू शकतो.
- या सर्व नियोजानाकरिता मुख्याध्यापक व कोविड व्यवस्थापक शिक्षक यांनी सार्वजनिक आरोग्य विभाग, अटल आरोग्य वाहिनी व डीजी हेल्थ प्रणाली यांचे मार्गदर्शन घ्यावे.
- वरील प्रत्येक बाबीमध्ये अटल आरोग्य वाहिनी व डिजी हेल्थ प्रणाली डॉक्टर शाळांना संपूर्ण सहकार्य व मार्गदर्शन करतील .
- अटल आरोग्य वाहिनी व डिजी हेल्थ प्रणालीचे डॉक्टर शाळांमध्ये संपूर्ण काळजी घेऊन मोकळ्या अथवा खुल्या जागेत आरोग्य जागृतीची सत्रे घेतील व कोरोना पासून बचाव करण्याकरिता करावयाच्या उपाय योजनांबद्दल मार्गदर्शन करतील .

**१३. कोरोनाची लागण झालेल्या व तीव्र लक्षणे असणाऱ्या विद्यार्थ्यावर उपचाराबाबत :-**

- सदर विद्यार्थी Quarantine Centre येथे उपचार घेत असल्यास तेथील डॉक्टरांच्या सल्ल्याने अटल आरोग्य वाहिनी व डिजी हेल्थ प्रणालीच्या डॉक्टरांनी मुख्याध्यापकांच्या सहाय्याने विद्यार्थ्यास तशी सेवा पुरविणाऱ्या रुग्णालयात हलवावे.
- या संपूर्ण प्रक्रियेमध्ये पालकांना सोबत घ्यावे. मुख्याध्यापकांनी शाळेच्या रेकॉर्ड करिता उपचारांबाबत पालकांचे संमती पत्र घ्यावे.
- त्या विद्यार्थ्यास रुग्णालयात दाखल करते वेळी/ केल्यानंतर तसे मुख्याध्यापकांनी प्रकल्प अधिकाऱ्यास /कार्यालयास तत्काळ कळवावे.
- शाळा व्यवस्थापन निधीच्या आरोग्य करिता राखीव निधीतून खर्च सुरु करावा व संभाव्य खर्चाची मागणी प्रकल्प कार्यालयास करावी.
- अटल आरोग्य वाहिनी व डिजी हेल्थ प्रणालीच्या डॉक्टरांनी संबंधित विद्यार्थ्यावर उपचार करत असणाऱ्या डॉक्टरांच्या संपर्कात राहावे. वेळोवेळी आवश्यक असणाऱ्या गोष्टी मुख्याध्यापक व प्रकल्प अधिकारी यांच्या निदर्शनास आणून द्याव्यात.
- या वेळी मुख्याध्यापकांनी शाळा व्यवस्थापन समितीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार पालकांना राहणे व जेवण याकरिता निधी उपलब्ध करून द्यावा.

- डिजी हेल्थ प्रणालीच्या कार्यक्षेत्रामध्ये १०८ रुग्णवाहिका उपलब्ध करून देण्याकामी FMO मदत करतील.
- रुग्णालयातून सुटी मिळाल्यानंतर अटल आरोग्य वाहिनी व डिजी हेल्थ प्रणालीचे डॉक्टर सदर विद्यार्थ्यावर नियमित लक्ष ठेवतील. नंतर त्या विद्यार्थ्यास शाळेत आराम करू देणे अथवा घरी नेणे याबाबत पालकांचा निर्णय अंतिम असेल.

**१४. कोविड १९ काळात अटल आरोग्य वाहिनी व डिजी हेल्थ प्रणाली या प्रकल्पांची जबाबदारी व कामे :-**

- शाळांशी रोज संपर्क साधून उपस्थित व आजारी विद्यार्थ्यांची माहिती गोळा करणे. त्याबाबत योग्य कार्यवाही करून प्रकल्प कार्यालयास कळविणे.
- आजारी विद्यार्थ्यांना शाळेवर भेट देऊन पुढील बाबींकरिता संदर्भित करणे.
- लक्षणे असणाऱ्या विद्यार्थ्यांचे विलगीकरण , टेस्टिंग व शाळांमध्ये आरोग्य शिक्षण सत्रे याबाबत शाळा प्रशासनास उपस्थित राहून पूर्ण मार्गदर्शन करणे.
- सीक रूम च्या व्यवस्थापनामध्ये सर्वतोपरी मदत करणे.
- विलगीकरण कक्षातील विद्यार्थ्यांचा नियमित फॉलो-अप घेणे.
- विलगीकरण काळ पूर्ण झाल्यानंतर डिस्चार्ज घेते वेळी विद्यार्थ्यांची टेस्ट करून घरी सोडण्याबाबत नियोजन करणे.
- वार्षिक आरोग्य तपासणी नेमून दिलेल्या बाबींचे काटेकोर पणे पालन करून गुणात्मक दृष्टीने पूर्ण करणे.
- जे विद्यार्थी घरी आहेत त्यांच्याशी फोनद्वारे संपर्क साधून तब्येतीची विचारपूस करणे. आवश्यक टेलीमेडिसिन सुविधा पुरविणे.
- गाव भेटींच्या माध्यमातून घरी असणाऱ्या विद्यार्थ्यांच्या आरोग्याची तपासणी करणे. आजारी विद्यार्थ्यांना औषधे पुरविणे. आवश्यक विद्यार्थ्यांना संदर्भित करून मुख्याध्यापक, अधीक्षक व अधीक्षिका यास कळविणे.
- आजारी विद्यार्थ्यांचा नियमित फॉलो-अप घेणे.

VIJESING
FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: CN = VIJESING FATTESING VASAVE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2021.12.14 12:35:25 +05'30'

**( वि. फ. वसावे )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**